मंत्रालय उपाहारगृहामार्फत पतविक्री सवलती अंतर्गत
पुरविण्यात आलेल्या खाद्यपेयांची देयके........

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग[उपाहारगृहे],
परिपत्रक क्रमांक-ओएसबी-१०९५/पविदे/मंउका,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २१ जून, १९९५.

संदर्भ:- १] शासकीय परिपत्रक क्रमांक जीएडी/सीएन्टी/रिकव्हरी/ॲरियर्स/१९६६,
दिनांक ३१ जानेवारी, १९६६.
२] शासकीय परिपत्रक क्रमांक-ओएसबी-१०८८/थपवि/मंउका,
दिनांक १ जून, १९८८
३] शासकीय परिपत्रक क्रमांक-ओएसबी-१०८९/पवि/मंउका,
दिनांक २९ डिसेंबर, १९८९.

प रि प त्र क

मंत्रालय उपाहारगृहामार्फत मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्री, राज्यमंत्री यांची कार्यालये तसेच मंत्रालयीन विभाग व मंत्रालयात होणाऱ्या उच्चस्तरीय बैठकींच्या मागणीनुसार खाद्यपेयांचा पुरवठा करण्यात येतो. मंत्रालयीन विभाग/संलग्न कार्यालयांना कोषागारातून रक्कम काढण्यासाठी विहित कार्यपद्धती अनुसरावी लागते असल्याने उपाहारगृहाने पुरविलेल्या खाद्यपेयांच्या देयकांची रक्कम वेळीच देणे त्यांना शक्य होत नाहीत. केवळ त्यामुळे गैरसोय होऊ नये म्हणून संबंधित विभाग/कार्यालयांना उधार विक्री सवलत पूर्वीपासून देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन परिपत्रकान्वये शासकीय विभाग/कार्यालयांना उपाहारगृहाची देयके तत्काळ व वेळेवर अदा करण्यासंदर्भात करावयाच्या पद्धतीचा अवलंब कसा करावा याबाबत सूचना यापूर्वीच देण्यात आल्या होत्या. तरीही असे निदर्शनास आले आहे की, बरेच मंत्रालयीन विभागातील अधिकारी, मा. मंत्री/राज्यमंत्री यांची कार्यालये त्यांच्या कार्यालयात घेण्यात येणाऱ्या सभा/बैठकांसाठी लागणाऱ्या चहापान व खाद्यपदार्थांची मागणी केवळ दूरध्वनीवरून करतात. परंतु उपाहारगृहाचे मागणीपत्रक भरून देत नाहीत. मागणीपत्र भरून न दिल्यामुळे पुरवठा केलेल्या खाद्यपदार्थांची देयके तयार करता येत नाहीत व त्यामुळे हिशोब नोंद ठेवता येत नाहीत. पुरवठा केलेल्या चहापानाची मागणीपत्रके आणण्यासाठी काही कार्यालयाकडे उपाहारगृहातील कर्मचाऱ्यांना दारोदार जावे लागते व असे आढळून आले आहे की, काही प्रसंगी चहा व खाद्यपदार्थांची मागणी केल्याची जबाबदारीही काही कार्यालयाकडून नाकारली गेली आहे.

[कृ. मा. प.]

३. तरी सर्व विभाग/कार्यालयांना अशी विनंती करण्यात येत आहे की, मंत्रालय उपाहारगृहाकडून विविध विभाग/कार्यालयाला देण्यात येणारी चहापान व खाद्यपदार्थांची सेवा अधिक चांगली व जबाबदाररित्या देता यावी यासाठी उपाहारगृहाकडून चहापान व खाद्यपदार्थांची मागणी करताना विहित नमुन्यातील मागणीपत्रकात मागणी न चुकता करावी व सहकार्य करावे.

[[illegible] आम्बेरकर]
सह सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग, [उपाहारगृहे]

प्रति,

१] मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
२] सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे कार्यालय,
३] सर्व मंत्रालयीन विभाग,
४] मंत्रालयातील इतर सर्व कार्यालये,
५] विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
६] नवीन प्रशासकीय भवन उपाहारगृह व कोकणभवन येथील सर्व कार्यालय,
७] व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह/विधानभवन उपाहारगृह/ कोकणभवन उपाहारगृह,
८] निवड नस्ती.

मजा/२०६९५